**सन २०१४-१५ च्या रब्बी हंगामात ५० पैशांपेक्षा कमी असलेल्या ज्या गावांमध्ये टंचाई परिस्थिती जाहीर करण्यांत आलेली आहे. अशा गावांना सहकारी कर्जाचे रुपांतरण व शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. टंचाई ०४१५/प्र.क्र. १५२ /२-स**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २२.०५.२०१५**

**पहा** :- १. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एससीवाय २०१५/प्र.क्र.९५/म-७, दि. १६ एप्रिल २०१५

**शासन परिपत्रक :-**

सन २०१४-१५ मध्ये राज्यातील काही भागात पडलेल्या अपु-या पावसामुळे राज्यातील ज्या क्षेत्रात रब्बी पिकांची हंगामी पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी आढळून आली त्या क्षेत्रातील गावांत उपरोक्त शासन निर्णयान्वये टंचाईसदृष्य परिस्थिती जाहीर करण्यात येऊन विविध सवलती जाहीर करण्यात आल्या आहेत. राज्यातील सर्व विभागामध्ये जिल्हाधिकाऱ्यांमार्फत रब्बी पिकांची अंतिम पैसेवारी जाहीर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी यांनी जाहीर केलेल्या अंतिम पैसेवारी प्रमाणे राज्यातील ६ महसुली विभागात एकूण १२५३ गावांमध्ये पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी आढळून आली आहे. या ५० पैशांपेक्षा कमी पैसेवारी घोषित केलेल्या १२५३ गावांमध्ये उपरोक्त शासन निर्णयान्वये टंचाई परिस्थिती जाहीर करण्यात येऊन सदर गावांना अतिरिक्त सुविधा नव्याने उपलब्ध करून देण्याचे जाहीर करण्यात आले आहे. यामध्ये पुढील सुविधा सहकार विभागाशी संबंधित आहेत.

(१) सहकारी कर्जाचे रुपांतरण
(२) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती

२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि. १६ एप्रिल २०१५ मधील सोबतचे परिशिष्ट "अ" ची प्रत या परिपत्रकासोबत जोडण्यात येत असून शासनाच्या प्रचलित धोरणांनुसार उपरोक्त शासन निर्णयातील परिशिष्ट "अ" मध्ये नमुद केलेल्या जिल्हयातील ज्या गावांमध्ये टंचाई परिस्थिती जाहीर केली आहे. त्या सर्व गावांतील अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण व शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती बाबत महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई व संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

या शासन परिपत्रकाची अंमलबजावणी कटाक्षाने करण्यात येईल याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य , पुणे यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२७१८१६१७६८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Officer On Special Duty
Date: 2015.05.27 18:16:53 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४) मा. विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य (सर्व)
५) प्रधान सचिव (पुनर्वसन व मदतकार्य ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग ) कृषी भवन, नवी दिल्ली.
११) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
१२) मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडीया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१३) उप मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, बॉम्बे रिजनल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१४) सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था.
१५) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१६) सर्व कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक.
१७) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक.
१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई
१९) सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,
२०) निवड नस्ती- २ स